परप्रांतीय अनधिकृत मासेमारीवर नियंत्रण ठेवण्यासाठी स्वतंत्र अंमलबजावणी कक्ष स्थापन करण्यासाठी समिती गठित करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि-११२४/प्र.क्र.६८/पदुम-१४**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १३ मार्च, २०२४

**प्रस्तावना -**

महाराष्ट्राच्या सागरी जलधी क्षेत्रामध्ये परप्रांतीय मच्छिमारांच्या अतिक्रमणावर कारवाई करण्यासाठी उपलब्ध असलेल्या साधनसामग्री व मनुष्यबळामुळे येणाऱ्या अडचणी, परराज्यातील मच्छीमारांकडे मासेमारीकरीता वापरण्यात येत असलेल्या अत्याधुनिक यंत्रसामुग्रीचा स्थानिक मच्छीमारांच्या मासेमारी उत्पन्नांवर होणारा परिणाम तसेच परप्रांतीय मच्छीमारांकडून होणाऱ्या अनधिकृत मासेमारीवर कारवाई करणाऱ्या कर्मचाऱ्यांवर होणारे हल्ल्यांचे प्रमाण इत्यादी बाबी वर नियंत्रण ठेवण्यासाठी परप्रांतीय अनधिकृत मासेमारी रोखण्यासाठी स्वतंत्र अंमलबजावणी कक्षाची निर्मिती करण्यासाठी अभ्यास समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

परप्रांतीय अनधिकृत मासेमारीवर नियंत्रण ठेवण्यासाठी स्वतंत्र अंमलबजावणी कक्षाची निर्मिती करण्यासाठी आयुक्त मत्स्यव्यवसाय यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती गठित करण्यास शासन मान्यता देत आहे.

| अ.क्र. | सदस्य | पदनाम |
|---|---|---|
| १ | आयुक्त मत्स्यव्यवसाय,महाराष्ट्र राज्य, मुंबई. | अध्यक्ष |
| २ | संबंधित ७ सागरी जिल्हयांचे जिल्हाधिकारी / प्रतिनिधी | सदस्य |
| ३ | संबंधित ७ सागरी जिल्हयांचे पोलीस अधिक्षक / प्रतिनिधी | सदस्य |
| ४ | उपसचिव (मत्स्यव्यवसाय), मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ५ | संबंधित ७ सागरी जिल्हयांचे सहायक आयुक्त मत्स्यव्यवसाय | सदस्य |
| ६ | सहआयुक्त मत्स्यव्यवसाय (सागरी), मत्स्यव्यवसाय, मुंबई. | सदस्य, सचिव |

**सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील.-**

१. महाराष्ट्रातील सागरी जलधी क्षेत्रामध्ये परंप्रातीय अनधिकृत मासेमारी रोखण्यासाठी शासनास उपाययोजना सूचविणे.

२. स्वंतत्र अमलबजावणी कक्ष स्थापन करण्यासाठी कक्षाची सरंचना, संविधानिक चौकट व निधीची तरतुद यांचा अभ्यास करणे.

३. परंप्रातीय अनधिकृत मासेमारीवर नियंत्रण ठेवण्यासाठी आवश्यक असलेली साधनसामुग्री व मनुष्यबळ यांचा अभ्यास करुन याबाबत शासनास उपाययोजना सूचविणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१४१३०९५९४००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KISHOR MAHADEO JAKHATE

Digitally signed by KISHOR MAHADEO JAKHATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=83112e1445917d0a21fbab36d7c0ff41e09863c93a2e62ea1b0c01da16b7a161, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=032A6ACBFD529D66DD76E26EAB14B28C6DD07D2F776E529B44BA2CB45324C503, cn=KISHOR MAHADEO JAKHATE
Date: 2024.03.14 13:19:49 +05'30'

**( किशोर जकाते )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व)
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
५. प्रधान सचिव (पदुम), मंत्रालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. जिल्हाधिकारी, पालघर /ठाणे/ मुंबई शहर/मुंबई उपनगर/ रायगड/ रत्नागिरी/ सिंधुदुर्ग.
८. पोलीस अधिक्षक, पालघर/ठाणे/मुंबई शहर/मुंबई उपनगर / रायगड / रत्नागिरी/सिंधुदुर्ग.
९. उप सचिव (मत्स्यव्यवसाय), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सह आयुक्त (सागरी), मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, पालघर /ठाणे/मुंबई शहर /मुंबई उपनगर /रायगड/ रत्नागिरी/सिंधुदुर्ग.
१२. निवडनस्ती.